**कल्याण-डोंबिवली महानगरपालिकेच्या स्थायी समितीने पारित केलेले ठराव क्र.१२७, १२८ व १२९, दि.२५/०३/२०१५ निलंबित करण्याबाबत.**

**महाराष्ट्र शासन**
**नगर विकास विभाग**
**शासन निर्णय क्रमांक:- कडोंम-१०१५/१७९४/प्र.क्र.७७/१५/नवि-२८**
मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरु चौक,
मंत्रालय, मुंबई - ४०० ०३२.
दिनांक:- ०४ मे, २०१७

**वाचा:-** १. कल्याण-डोंबिवली महानगरपालिका स्थायी समिती ठराव क्र.१२७, १२८ व १२९, दि.२५/०३/२०१५.
२. आयुक्त, कल्याण-डोंबिवली महानगरपालिका यांचे पत्र क्र.कडोंमपा/आस्था/मुका/७४०, दि.२०/०५/२०१६.

**प्रस्तावना:-**

डॉ. किशोर भिसे, तत्कालीन प्रभारी वैद्यकीय अधिकारी, कल्याण-डोंबिवली महानगरपालिका, डॉ.सुरेश कदम, वैद्यकीय अधिकारी, कल्याण-डोंबिवली महानगरपालिका आणि श्री.अशोक गावंडे, वरिष्ठ लिपिक, कल्याण-डोंबिवली महानगरपालिका यांनी आर.सी.एच-फेज-२ या कार्यक्रमांतर्गत वाहन भाडे तत्त्वावर घेण्याकरीता राबविण्यात आलेल्या निविदा प्रक्रियेची प्राथमिक चौकशी केली असता, त्यामध्ये अनियमितता केली असल्याचे आढळून आल्याने महानगरपालिका प्रशासनाने त्यांना काही काळासाठी निलंबित करुन शास्ती बजावली होती. प्रशासनाच्या या कारवाईविरोधात संबंधितांनी महानगरपालिकेच्या स्थायी समितीसमोर अपील केले. या अपिलाच्या अनुषंगाने स्थायी समितीने दि.२५/०३/२०१५ च्या ठराव क्र.१२७, १२८ आणि १२९ द्वारे या कर्मचाऱ्यांचा निलंबन कालावधी हा निलंबन कालावधी म्हणून न धरता, सेवा कालावधी म्हणून धरण्यात यावा, असे निर्देश महानगरपालिका प्रशासनास दिले.

२. स्थायी समितीने पारित केलेले उक्त ठराव पुढील पार्श्वभूमीवर विखंडीत करण्याची विनंती आयुक्त, कल्याण-डोंबिवली महानगरपालिका यांनी त्यांच्या वाचा क्र.२ येथील दि.२०/०५/२०१६ च्या पत्रान्वये केली आहे:-

"डॉ. किशोर भिसे, तत्कालीन प्रभारी वैद्यकीय अधिकारी, कल्याण-डोंबिवली महानगरपालिका, डॉ.सुरेश कदम, वैद्यकीय अधिकारी, कल्याण-डोंबिवली महानगरपालिका आणि श्री.अशोक गावंडे, वरिष्ठ लिपिक (सेवानिवृत्त), कल्याण-डोंबिवली महानगरपालिका यांनी कल्याण-डोंबिवली महानगरपालिकेच्या आर.सी.एच फेज-२ कार्यक्रमांतर्गत नोडल ऑफिसर पदाकरीता वाहन भाडे तत्त्वावर घेण्यासाठी आरोग्य विभागामार्फत पार पाडण्यात आलेल्या निविदा प्रक्रियेत संगनमत व गैरमार्गाने वाहन मालकास फायदा होईल आणि स्वतःचा आर्थिक फायदा होईल अशा पद्धतीने विहित कार्यपद्धतीचा अवलंब न करता खोटे दस्तऐवज तयार करुन महानगरपालिकेची फसवणूक केल्याचे

आढळून आले. या पार्श्वभूमीवर महानगरपालिका प्रशासनाकडून संबंधितांना महानगरपालिकेच्या सेवेतून निलंबित का करण्यात येऊ नये, अशा आशयाचे ज्ञापन बजावले. संबंधितांनी याबाबत दि.०३/०२/२०११ रोजी सादर केलेले खुलासे मान्य न करता त्यांची सखोल चौकशी करण्याकरीता महानगरपालिका प्रशासनाने त्यांना दि.२३/०२/२०११ च्या आदेशाद्वारे महानगरपालिका सेवेतून निलंबित केले व दि.०३/०९/२०११ च्या आदेशाद्वारे ज्ञापन व दोषारोपपत्र बजावून त्यांच्याविरुद्ध खातेनिहाय चौकशी सुरु करण्यात आली. तद्नंतर महानगरपालिकेच्या दि.१७/०१/२०१२ च्या आदेशाद्वारे या तिन्ही अधिकाऱ्यांना खातेनिहाय चौकशीच्या अंतिम निर्णयाच्या अधिन राहून सेवेत हजर करुन घेण्यात आले. यासंदर्भातील चौकशी अधिकारी यांनी दि.२५/०४/२०१३ रोजी सादर केलेल्या चौकशी अहवालाद्वारे संबंधितांवर ठेवलेले दोषारोप सिद्ध होत नसल्याचा निष्कर्ष पालिकेस कळविला. मुख्य लेखा अधिकारी यांनी सादर केलेल्या त्यांच्या दि.२५/०१/२०११ च्या प्राथमिक चौकशी अहवालास अनुसरुन वाहनाच्या भाड्यापोटी माहे ऑगस्ट, २०१० ते डिसेंबर, २०१० पर्यंत अदा केलेली एकूण रु.९२,३०४/- एवढी रक्कम संबंधितांच्या वेतनातून वसूल करण्यात आली. चौकशी अधिकारी यांनी संबंधितांवरील आरोप सिद्ध होत नसल्याचा निष्कर्ष काढला असला तरी, मुख्य लेखा अधिकारी यांचा प्राथमिक अहवाल विचारात घेता, सर्वच बाबी खोट्या आहेत, असे मानता येणार नसल्याने संबंधितांचा निलंबन कालावधी हा निलंबन काळ म्हणून ग्राह्य धरावा आणि त्यांच्याकडून वसूल केलेली रक्कम शास्ती म्हणून ग्राह्य धरुन महानगरपालिका प्रशासनाने दि.१९/११/२०१३ च्या आदेशाद्वारे खातेनिहाय चौकशीचे प्रकरण बंद केले. संबंधितांना केलेल्या शास्तीविरोधात त्यांनी दि.०३/१२/२०१३ रोजी स्थायी समितीकडे अपिल दाखल केले. स्थायी समितीने ठराव क्र.१२७, १२८ आणि १२९, दि.२५/०३/२०१५ द्वारे संबंधितांचा कालावधी हा निलंबन कालावधी म्हणून न धरता, सेवा कालावधी म्हणून धरण्यात यावा, असे निर्देश महानगरपालिका प्रशासनास दिले. स्थायी समितीने पारित केलेले उक्त ठराव महाराष्ट्र महानगरपालिका अधिनियमातील तरतूदीशी विसंगत असल्याने सदर ठरावांप्रमाणे कार्यवाही केल्यास चुकीचा पायंडा पडेल."

३. परिच्छेद क्र.२ मध्ये आयुक्त, कल्याण-डोंबिवली महानगरपालिका यांनी उक्त ठरावांच्या विखंडनाकरीता नमूद केलेली कारणमिमांसा विचारात घेता, कल्याण-डोंबिवली महानगरपालिकेच्या स्थायी समितीने पारित केलेले ठराव क्र.१२७, १२८ व १२९, दि.२५/०३/२०१५ हे महाराष्ट्र महानगरपालिका अधिनियमातील तरतुदीशी विसंगत असल्याने, तसेच या ठरावांनुसार कार्यवाही केल्यास चुकीचा पायंडा पडण्याची शक्यता असल्याने उक्त ठराव महाराष्ट्र महानगरपालिका अधिनियमाच्या कलम ४५१ (१) अनुसार निलंबित करण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**<u>शासन निर्णय</u>:-**

कल्याण-डोंबिवली महानगरपालिकेच्या स्थायी समितीने पारित केलेले ठराव क्र.१२७, १२८ व १२९, दि.२५/०३/२०१५ हे या शासन निर्णयाच्या प्रस्तावनेत नमूद करण्यात आलेल्या पार्श्वभूमीवर महाराष्ट्र महानगरपालिका अधिनियमाच्या कलम ४५१ (१) नुसार निलंबित करण्यात येत आहेत. याबाबत संबंधितांना काही अभिवेदन करावयाचे असल्यास त्यांनी ३० दिवसांत शासनास सादर करावे.

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संगणक संकेतांक २०१७०५०४१६३३४५५१२५ असा आहे. हा निर्णय डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करून काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

Digitally signed by Jayasingrao N Patil
Date: 2017.05.04 16:35:54 +05'30'

**( ज. ना. पाटील )**
**सह सचिव, महाराष्ट्र शासन**

**प्रत,**

१) मा.मुख्यमंत्री महोदयांचे प्रधान सचिव, मंत्रालय, मुंबई-३२.
२) महापौर, कल्याण-डोंबिवली महानगरपालिका, जिल्हा ठाणे.
३) आयुक्त, कल्याण-डोंबिवली महानगरपालिका, जिल्हा ठाणे.
४) प्रधान सचिव (नवि-२) यांचे स्वीय सहायक, नगर विकास विभाग, मंत्रालय, मुंबई-३२.
५) निवडनस्ती (नवि-२८).